राष्ट्रीय वृध्दापकाळ आरोग्य शुश्रुषा कार्यक्रमाकरीता सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी अनुसुचित जाती उपयोजनेतंर्गत केंद्र शासन व राज्य शासनाच्या हिश्श्याचे अनुदान वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय सा.आ.वि. क्र. एन पी एच २०१५/प्र.क्र. ३१ / आरोग्य-३अ**

१० मजला, जि.टी.रुग्णालय संकुल

मंत्रालय, मुंबई-४००००१

दि. ३० मार्च २०१५.

**वाचा**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र. T २२०११/०२/२०१४ NCD (i) (b) दि. १६ ऑक्टोबर २०१४.

२) आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्र.संआसे /NCD/ नस्ती क्र.२८ हिस्सा/८९-९४/१५ दि. १६/०१/२०१५.

**प्रस्तावना**

केंद्र शासनाकडुन राष्ट्रीय वृध्दापकाळ आरोग्य शुश्रुषा कार्यक्रमासाठी (NPHCE) सन २०१४ -१५ या वित्तीय वर्षाकरीता रु. २२ लक्ष इतके अनुदान अनुसुचित जाती उपयोजनेतंर्गत प्राप्त झाले आहे. सदर प्राप्त झालेले अनुदान त्याचप्रामणे केंद्र शासनाकडुन प्राप्त अनुदानाच्या २५% प्रमाणातील राज्य शासनाचा हिस्सा रु. ७.३३ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याची विनंती सह संचालक, आरोग्य सेवा यांच्या मार्फत करण्यात आली होती . त्यानुसार राष्ट्रीय वृध्दापकाळ आरोग्य शुश्रुषा कार्यक्रमासाठी अनुसुचित जाती उपयोजनेतंर्गत केंद्र शासनाकडुन प्राप्त रु. २२ लक्ष व राज्य शासनाचे २५ % प्रमाणे रु. ७.३३ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय**

राष्ट्रीय वृध्दापकाळ आरोग्य शुश्रुषा कार्यक्रमासाठी सन २०१४ -१५ या वित्तीय वर्षाकरीता अनुसुचित जाती उपयोजनेतंर्गत केंद्र शासनाकडुन प्राप्त रु. २२ लक्ष व राज्य शासनाचे २५ % प्रमाणे रु. ७.३३ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१४ -१५ साठी मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

७८९ - अनुसुचित जातीसाठी विशेष घटक योजना.

(०१) - अनुसुचित जाती उपयोजने अंतर्गत योजना.

केंद्र पुरस्कृत योजना - (केंद्र हिस्सा ७५ टक्के)

(०१) (१८) - राष्ट्रीय वृध्दापकाळ आरोग्य शुश्रूषा कार्यक्रम
(२२१० एफ ६३१)
३१- सहायक अनुदानाचे (वेदनेतर)
(राज्य हिस्सा २५ टक्के)
(०१) (१९) - राष्ट्रीय वृध्दापकाळ आरोग्य शुश्रूषा कार्यक्रम
(२२१० एफ ६४९)
३१- सहायक अनुदाने (वेदनेतर)

३. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखाधिकारी मुंबई यांचे कडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी , आरोग्य सेवा संचालनालय , मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व सहसंचालक ,आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ) मुंबई हे नियंत्रण अधिकारी म्हणुन घोषीत करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. २०१३/प्र.क्र.८५ /२०१३ /अर्थसंकल्प -३ , दि. २५/०४/२०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय समाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ५९/ २०१५ / व्यय १३ दि. ०५/०३/२०१५ व अनौपचारीक संदर्भ क्र. ३९४/अर्थोपाय /२०१४-१५ दि. ०३/०३/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०२००००६४८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shekhar Vasantrao Dhawale

Digitally signed by Shekhar Vasantrao Dhawale
DN: CN = Shekhar Vasantrao Dhawale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.03.31 15:34:01 +05'30'

**शेखर ढवळे**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
संचालक , आरोग्य सेवा,मुंबई.
अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान .
सहसंचालक , (असंसर्गजन्य रोग कक्ष) आरोग्य सेवा,मुंबई.
महालेखापाल महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता )/ (लेखा परिक्षा) मुंबई.
महालेखापाल महाराष्ट्र -२ (लेखा व अनुज्ञेयता )/ (लेखा परिक्षा) नागपुर.

अधिदान व लेखाधिकारी मुंबई.

निवासी लेखाधिकारी मुंबई.

वित्त विभाग, नियोजन विभाग, मंत्रालय , मुंबई-३२

कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प) सार्वजनिक आरोग्य विभाग.

निवडनस्ती.